“श्री गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सवा निमित्त शेगाव येथे मुलभूत सुविधा निर्माण करण्यासाठीचा विकास आराखडा” स्वीय प्रपंजी खात्यास मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-तीक्षेवि-२०२३/प्र.क्र.८४/१४४४-अ,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: १४ मार्च, २०२४.

**वाचा :-** १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.तिक्षेवि-२०१०/प्र.क्र.२६/का.१४४४, दिनांक २८ मार्च, २०१०
२) नियोजन विभाग,शासन निर्णय क्र.तिक्षेवि-२०१३/प्र.क्र.१२/का.१४४४, दिनांक २६ जून, २०१८
३) नियोजन विभाग,शासन निर्णय क्र.तिक्षेवि-२०१३/प्र.क्र.१२/का.१४४४, दिनांक २१ ऑगस्ट, २०१९
४) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांकःतिक्षेवि-२०१३/प्रक्र१२/का.१४४४, दिनांक १२ ऑगस्ट, २०२१
५) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : तिक्षेवि-२०२२/प्र.क्र.८/का.१४४४, दिनांक २१ मार्च, २०२२
६) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांकःतीक्षेवि-२०१३/प्र.क्र.१२/का.१४४४, दिनांक २७ ऑक्टोबर, २०२२

**प्रस्तावना:-**

“श्री गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सव शेगाव तीर्थक्षेत्रासाठी मुलभूत सुविधा निर्माण करण्याचा विकास आराखडा” साठी शासनामार्फत उपलब्ध करून देण्यात आलेला निधी कोषागारातून आहरित करून “विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती” यांच्या उघडण्यात आलेल्या “स्वीय प्रपंजी खाते (क्रमांक ००८४८४)” (PLA) मध्ये जमा करण्यास संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक २८ मार्च, २०१० च्या शासन निर्णयान्वये, मान्यता देण्यात आली. संदर्भाधीन क्रमांक २ येथील दिनांक २६ जून, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक ३१ मार्च, २०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. या “स्वीय प्रपंजी खाते (क्रमांक ००८४८४)” (PLA) ला संदर्भाधीन क्रमांक ३ येथील दिनांक २१ ऑगस्ट, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक ३१ मार्च, २०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. या आराखड्यातील कामे माहे मार्च, २०२२ पर्यंत पूर्ण करण्यास संदर्भाधीन क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. संदर्भाधीन क्रमांक ५ येथील दिनांक २१ मार्च, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये आराखडयातील मंजूर कामे पूर्ण होण्याकरीता ३१ मार्च, २०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. संदर्भाधीन क्रमांक ६ येथील दिनांक २७ ऑक्टोबर, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये PLA खात्यास दिनांक ३१ मार्च, २०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे “स्वीय प्रपंजी खाते (क्रमांक ००८४८४)” (PLA) ला दिनांक ३१ मार्च,२०२३ च्या पुढे दिनांक ३१ मार्च, २०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यास तसेच या खात्यातील अखर्चित रक्कम प्रत्यार्पित न करता आर्थिक वर्ष सन २०२३-२४ मध्ये खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

"श्री गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सव शेगाव तीर्थक्षेत्रासाठी मुलभूत सुविधा निर्माण करण्याचा विकास आराखडा" विहित कालावधीत पूर्ण करण्याकरिता "विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती" यांच्या नांवे उघडण्यात आलेल्या "स्वीय प्रपंजी खाते (क्रमांक ००८४८४)" (PLA) ला "प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ महाराष्ट्र मुंबई" यांचे कार्यालयाने दिलेल्या मान्यतेनुसार "विशेष बाब" म्हणून दिनांक ३१ मार्च, २०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. "स्वीय प्रपंजी खाते (क्रमांक ००८४८४)" (PLA) हे दिनांक ३१ मार्च, २०२४ पर्यंत सुरू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात येत असल्याने त्यातील दिनांक ३१ मार्च, २०२३ रोजी शिल्लक राहिलेली अखर्चित रक्कम, आर्थिक वर्ष सन २०२३-२४ मध्ये या आराखड्यांतर्गत मुलभूत सुविधा निर्माण करण्यासाठी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे. "स्वीय प्रपंजी खाते (क्रमांक ००८४८४)" (PLA) मध्ये शिल्लक असलेला अखर्चित निधी आर्थिक वर्ष सन २०२३-२४ मध्ये प्रथम खर्च करण्यात यावा.

२. वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २६/२०२४/कोषा प्रशा-५, दिनांक ०८.०२.२०२४ अन्वये, तसेच "प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ महाराष्ट्र, मुंबई" यांचे कार्यालयाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक संदर्भ "No.TM/Ch.2/UOR/planning dept./UOR-199/2023-24/1283" अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

३. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३१४१३५२३५१९१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND RAGHUNATH KULKARNI

Digitally signed by MILIND RAGHUNATH KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DB6FB8A1DB6A8793024B0C8728EB79AB35DD0CAE14DDA9621D73EA4347C7856A, cn=MILIND RAGHUNATH KULKARNI
Date: 2024.03.14 14:02:01 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**तातडीच्या आवश्यक कार्यवाहीसाठी,**

विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्षनेता विधानपरिषद / विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मा.पालकमंत्री,(बुलढाणा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. सन्माननीय विधानसभा, विधान परिषद व संसद सदस्य (सर्व),
८. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
१०. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर,
११. जिल्हाधिकारी, बुलढाणा,
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती,
१३. शासकीय अभियोक्ता, मुंबई उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ, नागपूर
१४. वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६/कोषा-५) मंत्रालय, मुंबई,
१५. नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई,
१६. निवड नस्ती, का. १४४४-अ, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.